राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेखालील तुट भरून
काढण्यासाठी अर्थसहाय्य सन २०१८-१९

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. विसउस/कार्या-४(अर्थ)/प्र.क्र.६६/२०१८-१९/राअसु**
जी.टी.हॉस्पिटल कॉम्प्लेक्स, ८ वा मजला,
लो.टि.मार्ग, मुंबई-४०० ००१
दिनांक- ०५ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा-**
१. कृषी व अन्न नागरी पुरवठा शासन निर्णय क्र.EST १५६३/१३३०-S-IV दिनांक ११ सप्टेंबर १९६१ व दिनांक २५/११/१९६४.
२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम-२०१३.
३. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग परिपत्रक क्र.विसउस/कार्या-४(अर्थ)/२०१५-१६/तुट निधी/प्र.क्र.३८९/२७१७ दि.३०/९/२०१५.
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि.०२ एप्रिल, २०१८

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाने दि.५ जुलै २०१३ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम २०१३ देशात लागू करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार देशपातळीवर ग्रामिण भागातील ७५ टक्के व शहरी भागातील ५० टक्के नागरीकांचा समावेश करण्यात आला आहे. या लाभार्थ्यांना प्रत्येक महिन्यास अनुदानीत दराने धान्य उपलब्ध करून देण्याबाबत तरतुद करण्यात आलेली आहे. अंत्योदय अन्न योजनेखालील कुटुंबाना प्रचलित निकषाप्रमाणे प्रतिमाह ३५ किलो तर प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्यासाठी प्रतिव्यक्ती प्रतिमाह ५ किलो याप्रमाणे धान्य देण्यात येते. याकरीता राज्यातील लाभार्थ्यासाठी एकूण ३,८३,७५८ मे.टन मासिक अन्नधान्य मंजूर आहे. अन्नधान्य रास्तभाव दुकानातून तांदुळ रू.३ प्रति किलो, गहु रू.२ प्रति किलो व भरडधान्य रू.१ प्रति किलो दराने देण्याची तरतुद अधिनियमात आहे. अन्नधान्य व्यवहारातील खरेदी व वाहतुक, हमाली व हाताळणूक यावरील अनुषंगिक खर्च असा एकूण खर्च व धान्य विक्रीतून प्राप्त होणारी रक्कम वजा जाता योजनेमध्ये येणारी तुट भरून भरून काढण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना संपूर्ण राज्यात दि.१ फेब्रुवारी २०१४ पासून लागू करण्यात आली आहे. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेतील अन्नधान्य व्यवहारात दुकानदाराचे मार्जिन, PoS मार्जिन आणि वाहतुक व हाताळणुकीवरील अनुषंगिक खर्च यामुळे स्वीय प्रपंजी लेख्यात येणारी तुट भरून काढण्यासाठी मंजूर तरतुद रक्कम रू.१०६३,५०,३९,०००/- आहे.

२. त्यापैकी वित्त विभागाने मंजूर केलेल्या रक्कमेमधून माहे एप्रिल २०१८ ते डिसेंबर २०१८ कालावधीत रास्तभाव दुकानदारांनी प्रत्यक्ष उचल केलेल्या धान्याच्या अनुषंगाने दुकानदारास दयावयाचे प्रति क्विंटल रू.७०/- प्रमाणे मार्जिन तसेच PoS मशीनद्वारे वितरीत केलेल्या धान्यासाठी दयावयाचे प्रति क्विंटल रू.८०/- मार्जिन आणि या कालावधीत वाहतुक,हमाली व हाताळणूक याबाबीवर झालेला प्रत्यक्ष अनुषंगिक खर्च अशा तिन्ही बाबीसाठी प्रतिपूर्ती करावयाची अर्थसहाय्य रक्कम रू.७०१,९१,९३,०००/- (**अक्षरी रूपये सातशे एक कोटी एक्यान्नव लाख त्र्यान्नव हजार फक्त**) सोबतच्या विवरणपत्रानुसार वित्तीय सल्लागार व उपसचिव आणि जिल्हाधिकारी यांना मंजूर करण्यात येत आहे.

३. लेखाधिकारी आणि जिल्हाधिकारी (जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी) यांनी अन्नधान्य व्यवहारातील तुटीच्या रक्कमेची प्रतिपूर्ती करण्यासाठी अधिदान व लेखा कार्यालय व जिल्हा कोषागार कार्यालय येथून अनुक्रमे रक्कम आहरीत करून या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र.एम-२, मुख्यलेखाशिर्ष २४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०१)अन्न, १०१-प्रापण व पुरवठा, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण ,(०३)(१८)राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेवरील तुटीच्या प्रतिपूर्तीसाठी अर्थसहाय्य (२४०८०६२७)३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीमधून भागविण्यात यावा. मुंबई क्षेत्रासाठी लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उपसचिव,अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांना रक्कम आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. मुंबई क्षेत्रासाठी लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांनी अर्थसहाय्य रक्कम अधिदान लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करून

वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात मुख्यलेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च, ०१-अन्न,९०० भांडवली लेख्यावरील जमा व वसुली, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण, (००)(०५) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना-मुंबई शहर- भांडवली लेख्यावरील जमा व वसुली (४४०८०३४४),७० वजा वसुली लेख्यात आणि मुफसल क्षेत्रासाठी (ग्रामिण) अर्थसहाय्य रक्कम जिल्हाधिकारी (जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी) यांनी जिल्हा कोषागार कार्यालयातून आहरीत करून जिल्हाधिकारी यांचे स्वीय प्रपंजी लेख्यात लेखाशिर्ष ४४०८ अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च ०१-अन्न, ९०० भांडवली लेख्यावरील जमा व वसुली (०३), प्रापण वितरण व किंमत नियंत्रण, (००)(०६) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना मुफसल भांडवली लेख्यावरील जमा व वसुली (४४०८०३५३), ७० वजा वुसली लेख्यात वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१५/ प्र.क्र.६/ कोषा प्र-५ दिनांक २७ सप्टेंबर,२०१६ नुसार **पुस्तकी समायोजनाद्वारे (फक्त मुफसल क्षेत्रासाठी)** जमा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर योजनेवरील अर्थसहाय्य रक्कम विनाअट स्वरूपाची आहे. तरी सदर देयक सादर करतेवेळी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.मुंधिनि-१००७/प्र.क्र.२२/०७/विनिमय दिनांक १६ मे २००७ नुसार प्रमाणकाच्या दर्शनी भागावर **बिनशर्त (Unconditional)** असल्याबाबत शिक्का मारण्यात यावा.

६. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि. ०२ एप्रिल २०१८ मधील अटी व शर्तीची पुर्तता झाली आहे. उपरोक्त शासन परिपत्रकामध्ये प्रशासकीय विभागास मिळालेल्या प्राधिकारानुसार व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ३४६ व्यय-१० दि. ३१ डिसेंबर, २०१८ च्या सहमतीने सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२०६१५२६२३६४०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सोबत-जिल्हानिहाय अपेक्षित तुट रक्कमेचे विवरणपत्र

Satyavan Kisanrao Ubale

Digitally signed by Satyavan Kisanrao Ubale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46312f6d99372bbfaa1abf8afd92601cfe82b77598529968ecb9b717b86ddc13, serialNumber=cfdaf958228a997f0edd8c32876eb1e49285efc7850109e7abb75654a9030a24, cn=Satyavan Kisanrao Ubale
Date: 2019.02.06 15:31:05 +05'30'

**( स.कि.उबाळे )**
**वित्तीय सल्लागार व उप सचिव**

**प्रत-**

१) सर्व जिल्हाधिकारी
२) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
३) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
४) महालेखापाल-१/२(ले व अ)महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) अधिदान व लेखा कार्यालय,बांद्रा,मुंबई-५१
६) सर्व जिल्हा कोषगार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय-
७) कार्यासन अधिकारी, (व्यय-१०) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
८) कार्यासन-३ (रोख शाखा) विसउस कार्यालय
९) कार्यासन-३ (देयक शाखा) विसउस कार्यालय
१०) कार्यासन-७(१), ७(२) विसउस कार्यालय
११) कार्यासन -११,१२ विसउस कार्यालय
१२) निवड नस्ती.

अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन निर्णय क्र.विसउस/कार्या-4(अर्थ)/2018-19/प्र.क्र-66/राअसु दि.05/02/2019 सोबतचे जिल्हानिहाय अपेक्षित तुट रक्कमेचे (अर्थसहाय्य) विवरणपत्र

(रक्कम रूपयात)

| अ.क्र. | जिल्हा | एप्रिल 2018 ते डिसेंबर 18 अपेक्षित तुट रक्कमेचे विवरणपत्र |
|---|---|---|
| 1 | मुंबई | 545578000 |
| 2 | ठाणे | 86295000 |
| 3 | पालघर | 238159000 |
| 4 | रायगड | 206234000 |
| 5 | रत्नागिरी | 115712000 |
| 6 | सिंधुदुर्ग | 70365000 |
| 7 | नाशिक | 444390000 |
| 8 | धुळे | 147835000 |
| 9 | जळगाव | 273365000 |
| 10 | नंदुरबार | 141544000 |
| 11 | अहमदनगर | 283405000 |
| 12 | पुणे ग्रामिण | 272618000 |
| 13 | पुणे शहर | 98650000 |
| 14 | सोलापूर ग्रामिण | 183220000 |
| 15 | सोलापूर शहर | 42697000 |
| 16 | कोल्हापूर | 281508000 |
| 17 | सांगली | 183215000 |
| 18 | सातारा | 169993000 |
| 19 | औरंगाबाद | 196822000 |
| 20 | जालना | 140187000 |
| 21 | नांदेड | 286814000 |
| 22 | बीड | 276402000 |
| 23 | उस्मानाबाद | 106802000 |
| 24 | परभणी | 93667000 |
| 25 | लातूर | 178841000 |
| 26 | हिंगोली | 87779000 |
| 27 | अमरावती | 209478000 |
| 28 | वाशिम | 99951000 |
| 29 | अकोला | 167543000 |
| 30 | बुलढाणा | 161514000 |
| 31 | यवतमाळ | 230097000 |
| 32 | नागपूर ग्रामिण | 208328000 |
| 33 | नागपूर शहर | 165585000 |
| 34 | वर्धा | 95434000 |
| 35 | भंडारा | 118355000 |
| 36 | गोंदिया | 106383000 |
| 37 | चंद्रपूर | 198848000 |
| 38 | गडचिरोली | 105580000 |
| | **एकूण** | 7019193000 |

Satyavan Kisanrao Ubale

Digitally signed by Satyavan Kisanrao Ubale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46312f6d99372bbfaa1abf8afd92601cfe82b77598529968ecb9b717b86ddc13, serialNumber=cfdaf958228a997f0edd8c32876eb1e49285efc7850109e7abb75654a9030a24, cn=Satyavan Kisanrao Ubale
Date: 2019.02.06 15:32:19 +05'30'

(स.कि.उबाळे)
वित्तीय सल्लागार व उपसचिव